महानगरपालिकामध्ये कार्यरत अधिकारी / कर्मचारी तसेच शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२१/प्र.क्र.११९/नवि-२०**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
४ था मजला, मुख्य इमारत,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २२ फेब्रुवारी, २०२२.

संदर्भ:- १) शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००५/१२६ सेवा ४, दिनांक ३१.१०.२००५

२) शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक : अंनियो-१००५ ७/१८ /सेवा ४, दिनांक ०७.०७.२००७

३) शासन निर्णय वित्त विभाग,क्रमांक : अंनियो-२०१५/NPS/प्र.क्र ३२ / सेवा ४, दिनांक ०६.०४.२०१५

४) शासन पत्र क्र. संकिर्ण-२००७/प्र.क्र.११५/नवी-२०, दिनांक २२.०९.२०१६.

५) शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.५३/कोषा प्रशा- ४, दिनांक ०७.०१.२०२१.

प्रस्तावना :-

१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर शासकीय सेवेत येणाऱ्या कर्मचाऱ्यांना राज्य शासनाने जुनी पेन्शन योजना ऐवजी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना (DCPS ) लागू केली आहे. सन २०१५ पासून DCPS योजना केंद्र शासनाच्या नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना (NPS) मध्ये वर्ग केली आहे. परंतु महापालिका स्तरावर सदरील योजना राबवताना एकवाक्यता दिसून येत नाही. जसे काही महानगरपालिकांमध्ये कर्मचारी हिस्सा कपात केला जात नाही. तर काही महानगरपालिकांकडून केला जातो. तसेच दिनांक १९.०८.२०१९ च्या वित्त विभागाच्या आदेशान्वये सर्व कर्मचारी / अधिकारी तसेच शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांना नियुक्ता १४% अंशदान दिले जात नाही, काही महानगरपालिका शिक्षकांना नियुक्ता अंशदान केवळ ५% देतात, राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना (NPS) अंतर्गत कपात होते परंतु राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना (NPS) मध्ये कर्मचाऱ्यांचे अद्याप खाते उघडण्यात आले नाही या संदर्भात सतत संबंधित शिक्षक / कर्मचाऱ्यांकडून शासनाकडे विचारणा होत आहे. त्यामुळे महानगरपालिका कर्मचारी / अधिकारी तसेच शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांच्या हितासाठी वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सर्व महानगरपालिकांमध्ये यासंदर्भात एकवाक्यता असावी यासाठी शासन निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महानगरपालिकामध्ये कार्यरत अधिकारी / कर्मचारी तसेच शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांच्या हितासाठी वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सर्व महानगरपालिकांमध्ये एकसुत्रीकरण राहणे आवश्यक आहे. सबब, सर्व महानगरपालिका अधिकारी/कर्मचारी, शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांना राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना (NPS) खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून लागु करण्यात येत आहे.

१) महानगरपालिकांमध्ये कार्यरत अधिकारी / कर्मचारी तसेच शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी इत्यादींना राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना (NPS) लागू करण्या अगोदर महानगरपालिकांनी एन.पी.एस. ट्रस्ट यांच्या सोबत करारनामा करणे आवश्यक राहील.

२) निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण आणि केंद्रिय अभिलेख देखभाल अभिकरण (CRA) - मे एन.एस.डि.एल. यांनी विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार कर्मचाऱ्यांची राष्ट्रीय निवृत्तीवेतन नोंदणी करावी. तद्नंतर महानगरपालिकांमध्ये दिनांक ०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर नियमित शासन मान्य पदावर विहित पद्धतीने नियुक्त झालेल्या अधिकारी / कर्मचारी तसेच शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना (NPS) मध्ये सामील करून घेता येईल तसेच त्यांचे राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत खाते उघडता येईल. त्यानंतर त्यांना Permanent Retirement Account Number (PRAN) देण्यात यावे.

३) महानगरपालिकांमध्ये दिनांक ०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर नियमित शासन मान्य पदावर विहित पध्दतीने नियुक्त झालेल्या अधिकारी/कर्मचारी, शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी इत्यादी यांच्या वेतनातुन त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासुन मुळ वेतन अधिक महागाई वेतन (असल्यास) अधिक महागाई भत्ता या रकमेच्या १०% दराने कर्मचारी अंशदान कपात करावे आणि नियोक्त्याचे अंशदान १०% देण्यात यावे. शासन निर्णय वित्त विभाग दिनांक १९.०८.२०१९ नुसार दिनांक ०१.०४.२०१९ पासुन नियोक्त्याचे अंशदान १४% ने भरण्यात यावे. सदर अंशदान सी.आर.ए. आणि ट्रस्टी बँक यांना पाठवावे.

ज्या महानगरपालिकांनी त्यांच्याकडील कर्मचाऱ्यांचे अंशदान १०% दराने अथवा त्यापेक्षा कमी दराने कपात करुन त्यावरील नियोक्त्याच्या अंशदानासह वा नियोक्त्याच्या अंशदान व्यतिरिक्त स्वतंत्र बँक खात्यामध्ये मुदत ठेवीमध्ये ठेवले आहे. त्यांनी सदर कर्मचाऱ्यांचे अंशदान तसेच त्यावर वेळोवेळी बँकेकडून मिळालेल्या व्याजाच्या रकमा अंतर्भूत करुन सी.आर.ए. आणि ट्रस्टी बँक यांना पाठवावे.

४) ज्या अधिकारी, कर्मचारी, शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी इत्यादींच्या वेतनातुन १०% पेक्षा कमी किंवा जास्त कपात केली असुन तसेच नियोक्याचे अंशदान विहित दराने दिले नसेल अशा प्रकरणी शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ०६.०४.२०१५ मधील परिच्छेद क्र.४९ नुसार कार्यवाही करावी.

५) ज्या अधिकारी, कर्मचारी, शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी इत्यादींच्या वेतनातुन अंशदान कपात केलेली नाही त्यांच्या बाबतीत मागील अंशदानाची वसुली शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ०७.०७.२००७ मधील परिच्छेद क्र.१६ नुसार करावी. त्यासोबत नियोक्त्याचे अंशदान विहित दराने देण्यात यावे.

६) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक अंनियो-२०१५/एनपीएस/प्र.क्र.३२ /सेवा- ४ दिनांक ०६.०४.२००४ मधील तरतुदीनुसार कपात केलेली रक्कम पूर्वीपासून शासकीय लेखात जमा केल्या असतील अथवा इतर बँकेत ठेवी ठेवले असतील तर सदरचे अंशदान थेट राष्ट्रीय निवृत्ती वेतनात वर्ग करण्याबाबत कार्यवाही करावी. (याबाबतची नोंदणी निवृत्ती वेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण आणि मे. एन.एस.डी.एल. ( National Securities Depository Limited) यांच्याकडे करावी तसेच अंशदान थेट मे.एन.एस.डी.एल. यांच्याकडे वर्ग करावे.)

७) महानगरपालिकांमध्ये कार्यरत महानगरपालिका आयुक्त, अधिकारी/कर्मचारी तसेच शिक्षक व शिक्षकेत्तर कमर्चारी यांच्यासाठी डीटीए (DTA) म्हणून महानगरपालिका आयुक्त यांच्यावर डीटीए (DTA) ची जबाबदारी सोपविण्यात येत आहे, (DTO) म्हणून महानगरपालिका मुख्य लेखा व वित्त अधिकारी अथवा त्यांच्या समकक्ष अधिकारी काम पाहतील. डीडीओ (DDO) म्हणून संबंधित विभागातील विभागप्रमुख / प्रशासन अधिकारी / शिक्षणाधिकारी काम पाहतील. शासन निर्णय दिनांक ०६.०४.२०१५ मध्ये नमुद आणि त्यानंतर वेळोवेळी सुधारित केल्यानुसार DTA, DTO, DDO यांच्या जबाबदाऱ्या योग्य त्या फेरफारासह लागु राहतील.

८) केंद्रीय देखभाल अभीकरणास परिरक्षण शुल्क अदा करणे,एकूण योजनेचा परिणामकारक अंमलबजावणी व संनियंत्रण करणे, या योजनेत जमा झालेल्या रक्कमांचा ताळमेळ घालून कर्मचारी निहाय अंशदान रक्कमेची मेळ/जुळणी घालणे/कपात अंशदानाची माहिती केंद्रीय देखभाल अभिकरण व विश्वस्त बँकेकडे पाठवणे आणि तक्रारीचे निराकरण करणे याबाबतची जबाबदारी DTO यांची राहील.

९) राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेच्या खात्यात जमा करण्यात येत असलेले अंशदान योग्य असल्याची खात्री दरमहा करण्याची जबाबदारी संबंधित कर्मचाऱ्याची राहील. त्यामध्ये काही त्रुटी आढळल्यास त्याबाबत कर्मचाऱ्याने आहरण व संवितरण अधिकाऱ्यास लेखी निवेदन देणे आवश्यक आहे. जो कर्मचारी याप्रकारे कार्यवाही करणार नाही तो भविष्यात कोणतीही तक्रार (कायदेशीर कार्यवाही) करु शकणार नाही.

१०) राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजने अंतर्गत अधिकारी, कर्मचारी, शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी इत्यादींच्या वेतनातुन अनिवार्यरित्या अंशदानाची कपात विहित दराने (१०%) आणि नियोक्त्याचे अंशदान विहित दराने (१०% वा १४%) जमा करण्याची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

११) राष्ट्रीय निवृत्तिवेतन योजनेच्या उचित अंमलबजावणीसाठी डिपार्टमेंटल नोडल ऑफिसर म्हणून शासनाचे सहसचिव व उपसचिव स्तरावरील अधिकाऱ्यांची नियुक्ती शासनाकडून केली जाईल. तसेच यथोचित नियंत्रणासाठी क्षेत्रीय स्तरावर तसेच State Controlling Officer (SCO) आणि उपराज्य देखभाल अभिकरण नेमण्यात येईल.

१२) वित्त विभागाच्या राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना (NPS ) संदर्भातील वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या आदेशांचे पालन होईल याची दक्षता घेण्यात यावी.

१३) असे प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभागाने त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक १४०/सेवा-४, दिनांक २१.१२.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१४) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२२१७३२४०५०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by C Priyanka
Date: 2022.02.22 19:01:15 +05'30'

**( प्रियांका कुलकर्णी-छापवाले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई-३२
३) मा.मंत्री, नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२
४) मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२
५) सर्व मा.संसद सदस्य / सर्व मा.विधीमंडळ सदस्य
६) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय , मुंबई-३२
९) आयुक्त, सर्व महानगरपालिका
१०) आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
११) आयुक्त, शिक्षण विभाग, पुणे
१२) जिल्हाधिकारी (सर्व)
१३) सर्व जिल्हा प्रशासन अधिकारी (नगर विकास)
१४) मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषद / नगरपंचायती
१५) निवडनस्ती (नवि-२०).